कोल्हापूर जिल्हयातील 'क' वर्गीय पर्यटन
स्थळाच्या विकासासाठी जिल्हा वार्षिक
योजना सन २००३-२००४ अंतर्गत
नियतव्यय वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमटीसी २००३/६/प्रक्र.३१०/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक १६ फेब्रुवारी, २००४.

वाचा:- जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्र. नियोजन/कार्या-१८/संस-३/जिवायो/१३७/२००३,
दिनांक १८.१०.२००३.

**शासन निर्णय :-** जिल्हा पातळीवरील योजनांसाठी वार्षिक योजना सन २००३-२००४ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदीमधून कोल्हापूर जिल्हयासाठी रु. ४०,००,०००/- (रु. चाळीस लाख फक्त) लाखाच्या नियतव्ययास शासनाकडून अंतिमत: मंजुरी देण्यात आली आहे. सदरची कामे पूर्ण करण्यासाठी नियोजन विभागाच्या कोअर प्लॅनप्रमाणे बजेट झालेली रक्कम रुपये २४,०४,०८६/- (रुपये चोवीस लाख चार हजार शहाऐंशी फक्त) एवढी आहे. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी खाली दर्शविलेल्या कामांच्या नकाशे, आराखडे व खर्चाच्या तपशीलास स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या दिनांकास प्रशासकीय मान्यता दिली आहे.

**तक्ता**

| अ. क्र. | कामाचे नांव | कामाची अंदाजित किंमत(रु.) | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशाचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जोतिबा वाडी रत्नागिरी, ता. पन्हाळा, जि.कोल्हापूर येथील गट क्र. ९०८ व ९०७ मधील सामुहिक जमिनीवर गट लागवड २.५ हेक्टरक्षेत्राकरीता पूर्व पावसाळी कामे घेणे | १,०२,०२४/- | २९.८.२००३ |
| २ | काडसिध्देश्वर (कणेरी), ता. करवीर, जि. कोल्हापूर येथे पर्यटकांसाठी पिकअप शेड बांधणे. | ७५,३९६/- | ५.११.२००१ |
| ३ | काडसिध्देश्वर (कणेरी), ता. करवीर, जि. कोल्हापूर येथे पर्यटकांसाठी स्वच्छतागृह बांधणे. | १,४३,२२६/ | ५.११.२००१ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | जोतिबा वळण रस्ता कि. मी. ६ ते ८ रस्ता दुतर्फा वृक्ष लागवड (लांबी २ कि. मी.) | ७०,९४३/- | २०.१०.२००१ |
| ५ | गिरोली ते गिरोली फाटा रस्ता दुतर्फा वृक्ष लागवड लांबी २ कि. मी. | ७०,९४३/- | २०.१०.२००१ |
| ६ | जोतिबा (वाडी रत्नागिरी) येथे गट नं. १ सामुहिक जमिनीवर गट लागवड २.५० हेक्टर व तारेचे कुंपण करणे. | १,२८,६३१/- | २०.१०.२००१ |
| ७ | जोतिबा (वाडी रत्नागिरी) येथे गट मं. १०८ सामुहिक जमिनीवर गट लागवड२.५ हेक्टर व तारेचे कुंपण करणे | १,२०,२०६/- | २०.१०.२००१ |
| ८ | काडसिध्देश्वर (कणेरी), ता. करवीर, जि. कोल्हापूर येथे पर्यटकांसाठी रस्ते खडीकरण व डांबरीकरण | ८,४०,३१५/- | २०.१०.२००१ |
| | एकूण:- | १५,५१,६८४/- | |

२. **वरील परिच्छेदातील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या एकूण आठ कामांसाठी सन २००३-२००४ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदीमधून अर्थसंकल्पीत कोअर नियतव्यय रुपये २४,०४,०८६/- (रु. चोवीस लाख चार हजार शहाऐंशी फक्त) लक्षच्या ५५% रक्कम म्हणजेच रु. १३,२२,२४७/- (रु. तेरा लाख, बावीस हजार, दोनशे सत्तेचाळीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्यास शासन मंजुरी देत आहे. सदर रक्कम तक्त्यात दर्शविलेल्या कामांच्या प्राथम्यक्रमानुसारच खर्च करण्यात यावी.**

३. वर परिच्छेदामध्ये नमूद करण्यात आलेला खर्च हा २००३-०४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष " ३४५२ पर्यटन मागणी क्र. बी-७ - ०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा-१०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०२) (१९) पर्यटन विकासासाठी ' अ ब क ' श्रेणीमध्ये वर्गीकृत केलेली ठिकाणे (३४५२ १७८९) " या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना **'आहरण व संवितरण अधिकारी'** म्हणून घोषित करण्यात येत असून संबंधित देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्यासही प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी याबाबत विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन रक्कम आपल्या ताब्यात घेऊन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी. मंजुर करण्यात आलेल्या रु. १३,२२,२४७/- (रु. तेरा लाख, बावीस हजार दोनशे सत्तेचाळीस फक्त) चे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी महालेखाकार (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर यांना सादर करावे व त्याची एक प्रत शासनास न चुकता सादर करावी. तसेच सदर रक्कम त्याच कामासाठी खर्ची घालावी. **मंजुर अनुदानापेक्षा जादा खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.**

४. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी सदरची रक्कम तात्काळ संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडे सुपूर्द करावी व सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, कामाची भौतिक प्रगति तसेच सुपूर्द करण्यात आलेल्या रक्कमेचे विनियोग दर्शविणारे विवरण इत्यादीचाअहवाल दरमहा १० तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.

५. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून काढल्यावर त्यासंबंधीच्या देयकाचा प्रमाणक क्रमांक, देयकाची रक्कम, कोषागाराचे नांव, दिनांक इ. माहिती खर्च मेळ घालून शासनास सादर करावी.

६. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-५५/२००४/व्यय-८, दिनांक १६.१.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. य. नलावडे )
अवर सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),मुंबई,
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा- कोल्हापूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, जिल्हा - कोल्हापूर,
नियोजन विभाग (का.१४१२), मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-८), मंत्रालय, मुंबई,
गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती. कार्यासन-पर्यटन